"महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत काम करणा-या विवीध क्षेत्रीय यंत्रणांना (कृषी विभाग, वन विभाग, सामाजिक वनीकरण, विभाग व अन्य क्षेत्रिय यंत्रणा) यांना कंत्राटी मनुष्यबळ उपलब्ध करुन देणेबाबत".

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग (रोहयो प्रभाग)**
**शासन निर्णय क्रमांक :- मग्रारोहयो २०२१/प्र.क्र.७८/रोहयो ७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २४ सप्टेंबर, २०२१

वाचा :- १) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी कायदा - २००५,
२) महाराष्ट्र रोजगार हमी अधिनियम (सुधारित) कायदा - २००६,
३) नियोजन (रोहयो) विभाग शासन परिपत्रक क्रमांक मग्रारोहयो-२०१०/प्र.क्र.०७/रोहयो १०-अ दिनांक १६ डिसेंबर, २०१०
४) नियोजन (रोहयो) विभाग शासन परिपत्रक क्रमांक मग्रारोहयो-२०२०/प्र.क्र.०४/रोहयो ०३ दिनांक ११ फेब्रुवारी, २०१३
५) नियोजन (रोहयो) विभाग शासन परिपत्रक क्रमांक मग्रारोहयो-२०२०/प्र.क्र.७७/रोहयो ०३ दिनांक ११ फेब्रुवारी, २०१३
६) नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्रमांक आस्थाप -२०१७ /प्र.क्र.१०२/ मग्रारोहयो दिनांक २९ सप्टेंबर, २०१७
७) नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्रमांक मग्रारोहयो -२०२०/प्र.क्र.२१ / रोहयो-०७ दिनांक ०५ सप्टेंबर, २०२०
८) नियोजन (रोहयो) विभाग शासन निर्णय क्रमांक मग्रारोहयो -२०२०/प्र.क्र.३०/ रोहयो-०७ दिनांक ०५ ऑक्टोबर, २०२०
९) आयुक्त, नरेगा, नागपूर यांचे पत्र क्र. आमगांराग्रारोहयोमहा / एचआर /१३४२/२१ दिनांक ०८ जुन, २०२१.
१०) नियोजन (रोहयो) विभाग शासन परिपत्रक क्रमांक मग्रारोहयो-२०२०/प्र.क्र.०५/रोहयो ०७ दिनांक ०४ ऑगस्ट, २०२१.
११) नियोजन (रोहयो) विभाग शासन परिपत्रक क्रमांक मग्रारोहयो-२०२०/प्र.क्र.७७/रोहयो ०७ दिनांक २५ ऑगस्ट, २०२१.
१२) नियोजन (रोहयो) विभाग शासनाचे पत्र क्रमांक मग्रारोहयो-२०२०/प्र.क्र.७८ रोहयो ०७ दिनांक ०२ सप्टेंबर, २०२१.

**प्रस्तावना:-**

देशातील ग्रामीण क्षेत्रातील कुटूंबीयांना कमीत कमी १०० दिवसांच्या रोजगाराची हमी देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना कार्यान्वीत केली असून, ती सन २००८ पासून महाराष्ट्राच्या सर्व जिल्हयात सुरु आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाने कंत्राटी तत्त्वावर मनुष्यबळ घेण्याची अनुमती दिलेली आहे.

त्या अनुषंगाने, क्षेत्रीय स्तरावर कंत्राटी पध्दतीने MIS समन्वयक, सहाय्यक कार्यक्रम अधिकारी, तांत्रिक अधिकारी, क्लार्क कम डाटा एंट्री ऑपरेटर यांची नियुक्ती करण्यात येते.

जिल्हा आणि तालुका पातळीवर कंत्राटी कर्मचारी यांची नियुक्ती करण्यासाठी नियोजन (रोहयो) विभागाच्या दिनांक ११ फेब्रुवारी, २०१३ व ११ नोव्हेंबर, २०२० रोजीच्या शासन निर्णयानुसार मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्यात आलेल्या आहे. सद्यस्थितीत सदर शासन निर्णयानुसार प्रत्येक वर्षात निर्माण झालेल्या मनुष्यदिवसांच्या आधारे क्षेत्रीय स्तरावर नियुक्ती करण्यात येते.

तथापि, उपरोक्त पध्दतीने जिल्हाधिकारी कार्यालय, जिल्हा परिषद कार्यालय तसेच यंत्रणा विभागांना सदर पदांची आवश्यकता असली तरीही सदर पदांची विभागणी ही समतोल पध्दतीने करण्यात आल्याचे दिसून येत नाही व क्षेत्रीय यंत्रणा यांच्याकडून वेळोवेळी मनुष्यबळ उपलब्ध करण्याबाबत विचारणा करण्यात येते.

केंद्र शासनाची "मनरेगा" (MGNREGS) योजना तसेच, राज्याची महाराष्ट्र रोजगार हमी योजना यांची राज्यात प्रभावीपणे अंमलबजावणी करुन राज्यातील प्रत्येक शेतकऱ्याचे जीवनमान उंचावून **"मी समृध्द तर गाव समृध्द आणि "गाव समृध्द तर, माझा महाराष्ट्र समृध्द"** ही संकल्पना यशस्वीपणे राबविण्यात येत आहे. त्याकरिता राज्य, विभाग, जिल्हा आणि पंचायत समिती स्तरावर नियुक्त करण्यात आलेल्या कंत्राटी कर्मचा-यांच्या आकृतीबंधात खालील बाबी विचारात घेऊन बदल करणे आवश्यक आहेत :-

अ) जेथे मोठया प्रमाणावर कामे होत आहेत, तेथे अधिक मनुष्यबळ/कर्मचारी देणे. जसे- ग्राम पंचायती नियंत्रित करणाऱ्या पंचायत समित्या.

ब) "नरेगा सॉफ्ट" या प्रणालीमुळे आकडेवारी (डाटा) संकलन सारखी कागदी कामे कमी झाली आहेत. त्यामुळे, उच्चस्तरीय कार्यालयातील अनावश्यक पदे व्यपगत करुन पंचायत स्तरावर नवीन/अधिक पदे निर्माण करणे.

क) मनरेगा (MGNREGS) योजनेच्या आवश्यकतेनुसार "पंचायत राज" केंद्रस्थानी करणे आवश्यक आहे. जसे - ग्राम पंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद स्तर, त्यानुसार मंजूर आकृतीबंधात सुधारणा करणे.

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने (यापुढे "रोहयो" व्दारे संदर्भित) अंतर्गत ग्राम पंचायत व्यतिरिक्त इतर यंत्रणेव्दारे सुध्दा मोठया प्रमाणावर कामे हाती घेण्यात येऊन स्थानिक पातळीवर मोठया प्रमाणावर रोजगार उपलब्ध करुन देण्यात येतो. तथापि, सदर यंत्रणास्तरावर मगांराग्रारोहयो मार्फत कोणतेही कंत्राटी मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यात येत नाही. यंत्रणास्तरावर कामाच्या आवश्यकते प्रमाणे (मनुष्य दिवस निर्मितीच्या आधारावर) कंत्राटी कर्मचारी उपलब्ध करुन दिल्यास कामांची गती वाढण्यास मदत होईल.

१. त्याकरिता ज्या जिल्हयात कमी प्रमाणात रोजगार निर्मिती होत आहे त्या जिल्हयात तालुक्यांऐवजी जिल्हयाला एक युनिट म्हणून ग्राहय धरुन कंत्राटी कर्मचारी संख्या निश्चित करुन देण्याची आवश्यकता आहे.

२. ज्या तालुक्यात HDI index कमी आहे किंवा आदिवासीबहुल किंवा मागासलेले तालुके आहेत आणि तेथे रोहयोच्या माध्यमातून लोकांना रोजगार उपलब्ध करुन देऊन कायमस्वरुपी मत्ता निर्माण करण्याची आवश्यकता आहे, अशा तालुक्यांमध्ये गट स्तरावर Community Mobiliser म्हणून योग्य कर्मचा-यांची नियुक्ती केल्यास रोहयोचा विस्तार पूर्ण महाराष्ट्र राज्यात प्रभावीपणे करण्यात मदत होईल.

वरील सर्व बाबी करिता राज्य शासनाने सेवानिवृत्त मा. अपर मुख्य सचिव श्री व्ही. गिरिराज यांच्या अध्यक्षतेखाली रोजगार हमी विभागाच्या पुनर्रचनेबाबत अभ्यास समिती स्थापन केली होती. सदर समितीच्या अहवालानुसार आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नागपूर यांनी सहाय्यक कार्यक्रम अधिकारी (APO), तांत्रिक सहाय्यक (PTO) व क्लर्क कम डेटा एंट्री ऑपरेटर (CDEO) ची अनुक्रमे १९२, १०६, ५०५ पदे ज्या कार्यालयात अधिक मनुष्यबळाची आवश्यकता आहे अशा कार्यालयात वर्ग करणेबाबत आयुक्त, नरेगा, नागपूर यांनी प्रस्ताव सादर केला आहे.

उपरोक्त परिस्थिती लक्षात घेता, राज्यात विविध पदांवर कार्यरत अतिरिक्त कंत्राटी मनुष्यबळाचे पुर्ननियोजन करुन क्षेत्रीय स्तरावर खालील नमुद केल्याप्रमाणे अतिरीक्त मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात निर्मिती झालेल्या मनुष्यदिवसानुसार, जिल्हा MIS समन्वयक, कार्यक्रम व्यवस्थापक, सहाय्यक कार्यक्रम अधिकारी, तांत्रिक सहाय्यक व क्लार्क कम डाटा एन्ट्री ऑपरेटर ही पदे खालील नमूद केल्याप्रमाणे सुधारीत पध्दतीने क्षेत्रीय यंत्रणांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

आयुक्त, नरेगा, नागपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावास शासन स्तरावर मान्यता देण्यात येत असून क्लर्क कम डेटा एंट्री ऑपरेटर (CDEO) ची पदे रोजगार महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत काम करणाऱ्या क्षेत्रीय यंत्रणा यांना तर १२ पदे विभागीय आयुक्त कार्यालय, ३४ पदे जिल्हाधिकारी कार्यालय व ६८ पदे जिल्हा परिषद कार्यालय या ठिकाणी प्रस्तावित करण्यात येत असून सदर बाबतचा यंत्रणा निहाय व ज़िल्हानिहाय तपशील **प्रपत्र-अ ते प्रपत्र- क** मध्ये जोडला आहे.

### अ) क्लार्क कम डाटा एंन्ट्री ऑपरेटर (CDEO)

जिल्हयात प्रामुख्याने तालुका स्तरावर तीन यंत्रणा कृषि विभाग, वन विभाग व सामाजिक वनीकरण विभाग रोहयोचे कामाची अंमलबजावणी करतात. प्रत्येक जिल्हयामध्ये एका यंत्रणा विभागाने निर्माण केलेल्या मनुष्य दिवसाचे आधाऱ्यावर खालील प्रमाणे क्लार्क कम डाटा एन्ट्री ऑपरेटरची नियुक्ती करण्यात येत आहे.

संबंधित विभागाचे जिल्हा स्तरावर निर्माण झालेले मनुष्यदिवस निर्मीतीच्या आधाऱ्यावर संभाव्य चांगले मनुष्यदिवस तयार करणाऱ्या तालुक्यांसाठी. जिल्हास्तरीय अधिकाऱ्यांच्या अधिकारात खालील प्रमाणे क्लार्क कम डाटा एंन्ट्री ऑपरेटरची नियुक्ती करण्यात येत आहे.

- राज्यामधील संबंधित विभागाचे सरासरीपेक्षा जास्त मनुष्यदिवस निर्मिती - ३ डाटा एन्ट्री ऑपरेटर
- (सरासरी मनुष्यदिवस/२) ते सरासरी मनुष्यदिवस निर्मिती - २ डाटा एन्ट्री ऑपरेटर
- इतर सर्व जिल्हे - १ डाटा एन्ट्री ऑपरेटर

तसेच तालुका स्तरावर निर्माण झालेले मनुष्य दिवसाचे आधाऱ्यावर तालुका स्तरीय अधिकारीच्या कार्यालयात खालील प्रमाणे डाटा एन्ट्री ऑपरेटरची नियुक्ती करण्यात येत आहे :-

- २५००० मनुष्यदिवस पेक्षा जास्त मनुष्यदिवस निर्मिती - १ डाटा एन्ट्री ऑपरेटर
- २५००० मनुष्यदिवस पेक्षा कमी मनुष्यदिवस निर्मिती - निरंक

उपरोक्त सुत्रानुसार आर्थिक वर्ष २०२०-२१ मध्ये वरील तीन विभागीय यंत्रणाने निर्माण केलेल्या मनुष्यदिवसाच्या अनुषंगाने **परिशिष्ठ-अ** मध्ये नमूद केल्याप्रमाणे डाटा एन्ट्री ऑपरेटर ची नियुक्ती करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे .

तसेच जिल्हास्तरावर देण्यात येणारे डाटा एन्ट्री ऑपरेटर यांची चांगले मनुष्यदिवस निर्मिती करणा-या संभाव्य तालुक्यांना देण्याची जबाबदारी ही जिल्हा यंत्रणा प्रमुख यांची राहील. संबंधित यंत्रणाचे जिल्हाप्रमुख यांनी जिल्हास्तरावर उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या डाटा एन्ट्री ऑपरेटर यांना त्यांचे कार्यालयामध्ये कामावर न ठेवता निश्चित केलेल्या तालुका स्तरीय अधिकारी यांचेकडे नियुक्त करणे बंधनकारक राहील. तीनही यंत्रणाचे जिल्हानिहाय आणि तालुकानिहाय नियुक्त करावायचे डाटा एन्ट्री ऑपरेटरची संख्या **परीशिष्ट-अ** व **परिशिष्ट-ब** मध्ये नमूद करण्यात आलेली आहे.

**ब) तांत्रिक सहाय्यक**

आयुक्त कार्यालय आणि पंचायत समिती स्तरावरील तांत्रिक कामे, SECURE कामे करण्याकरिता राज्य तांत्रिक समन्वयक आणि तांत्रिक सहाय्यक क्रमशः उपलब्ध आहेत. परंतु जिल्हास्तरावर SECURE प्रणालीचा ज्ञान असणारे कर्मचारी उपलब्ध नसल्यामुळे आयुक्त कार्यालयाला थेट तालुकास्तरावर समन्वय साधण्याकरिता अडचणी निर्माण होत आहे. म्हणून प्रत्येक जिल्ह्यात जिल्हा परिषदेमध्ये एक जिल्हा नोडल तांत्रिक सहाय्यक पदाची निर्मिती करून तिथे त्या जिल्ह्यातील एक तांत्रिक सहाय्यक नियुक्त करण्यात येत आहे. तथापि, ज्या जिल्ह्यात तांत्रिक सहाय्यक पदाची कमी असल्याने जिल्हा नोडल तांत्रिक सहाय्यक नियुक्त करणे शक्य नसेल, त्या जिल्ह्यात महसूल विभागातील दुसऱ्या जिल्ह्यातुन एका तांत्रिक सहाय्यकाची जिल्हा नोडल तांत्रिक सहाय्यक म्हणून नियुक्ती करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

तसेच महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत अति उत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्ह्यांना द्यावयाच्या तांत्रिक सहाय्यकांची माहिती **परिशिष्ट-क** मध्ये नमूद करण्यात आली आहे.

**क) जिल्हा MIS समन्वयक आणि कार्यक्रम व्यवस्थापक**

जिल्हाधिकारी कार्यालयात कार्यरत जिल्हा MIS समन्वयक यांना जिल्हाधिकारी कार्यालया सोबतच जिल्हा परिषद कार्यालयात संलग्न करण्यात येत आहे.

कार्यक्रम व्यवस्थापक या पदाची पदनिर्मिती करत असताना या पदाकरिता किमान अर्हता ही कृषी व्यवस्थापन व समाजकार्य या विषयात पदवीधारक असावी असे होते. सदर बाब लक्षात घेता ज्या जिल्हयात १ कार्यक्रम व्यवस्थापक व १ जिल्हा MIS समन्वयक कार्यरत असेल त्या जिल्ह्यातील कार्यक्रम समन्वयक यांनी जिल्हा प्रशिक्षण समन्वयक म्हणून अतिरिक्त कार्यभार सांभाळावा. जिल्ह्यात एकापेक्षा अधिक कार्यक्रम व्यवस्थापक उपलब्ध असल्यास कोणत्या कार्यक्रम व्यवस्थापकाकडे जिल्हा प्रशिक्षण समन्वयकाचा कार्यभार सोपवावा हा निर्णय उपजिल्हाधिकारी (रोहयो) यांनी घ्यावा.

एखाद्या जिल्ह्यात **मनुष्यदिवस निर्मिती / Active Job Card** निहाय मंजूर मनुष्यबळापेक्षा अधिक मनुष्यबळ उपलब्ध असेल अशा जिल्हा आणि तालुक्यात त्यांचे मनुष्यदिवस निर्मितीमध्ये वाढ करण्याकरिता ११ महिन्याचा कालावधी देण्यात येईल आणि तदनंतर सुद्धा प्रगती समाधानकारक नसल्यास अतिरिक्त कर्मचाऱ्यांना अन्य आवश्यक असलेल्या ठिकाणी समायोजित केले जाईल.

सदर मनुष्यबळ उपलब्ध करून द्यावयाची प्रक्रिया यांचे सनियंत्रण आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नागपूर व CSC-SPV ई-गव्हर्नन्स इंडिया प्रायव्हेट लिमिटेड, नवी दिल्ली यांनी करावे.

याप्रमाणे पुनर्स्थापना करीत असताना मोठ्या प्रमाणावर कंत्राटी कर्मचाऱ्यांच्या कार्याच्या स्थानात बदल होणार आहे हे लक्षात घेऊन विविध कंत्राटी पदांमधील लोकांना सध्यापेक्षा इतर ठिकाण सोयीचे असल्यास तशी माहिती शासन स्तरावर ती Google Form च्या मदतीने गोळा करण्यात आली आहेत. त्याचा वापर करण्यात यावा शक्यतो कोणत्याही कर्मचाऱ्याला खूपच लांबच्या ठिकाणी स्थलांतरित व्हावे लागणार नाही याची काळजी घेण्यात यावी.

सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२१०९२४१६०३२०४९१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

NANDKUMAR VERMA

Digitally signed by NANDKUMAR VERMA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, pseudonym=8DD51EE304775C22C23852DC8597F84B9FEF8A01, serialNumber=DCD3577EBF0E05E2A8B57095C152DC6CFB37C2BB83DA197788645DD8A362EBC5, cn=NANDKUMAR VERMA
Date: 2021.09.24 16:07:15 +05'30'

**( नंदकुमार )**
**अपर मुख्य सचिव (रोहयो)**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा.मंत्री (रोहयो), यांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री (रोहयो), यांचे खाजगी सचिव
३) मा. अपर मुख्य सचिव (रोहयो), यांचे स्वीय सहायक .
४) सर्व विभागीय आयुक्त.
५) आयुक्त, कृषी आयुक्तालय, पुणे.
६) आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नागपूर
७) सर्व जिल्हाधिकारी.
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
९) सर्व उपायुक्त (रोहयो), विभागीय आयुक्त कार्यालये.
१०) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, पुणे.
११) संचालक (मृद संधारण), कृषी आयुक्तालय, पुणे.
१२) मुख्य अभियंता (मृद व जलसंधारण) सर्व.
१३) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी
१४) सर्व जिल्हा रेशीम अधिकारी.
१५) सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो).
१६) सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (नरेगा, ग्रामपंचायत)
१७) सर्व गटविकास अधिकारी, नरेगा.
१८) उपवनसंरक्षक (सर्व).
१९) उपसंचालक, सामाजिक वनीकरण (सर्व)
२०) वित्त विभाग (अर्थ-१६ , व्यय-८)
२१) नियोजन विभाग (का.१४३४ व का.१४२४)
२२) निवड नस्ती, रोहयो - ७.

# परिशिष्ट - अ

## आर्थिक वर्ष २०२०-२१ मध्ये विभागीय यंत्रणाने निर्माण केलेल्या मनुष्यदिवसाच्या अनुषंगाने नियुक्त करावयाच्या कलार्क कम डाटा एन्ट्री ऑपरेटरची संख्या

### अ) कृषी विभाग

| अ.क्र | सरासरी पेक्षा जास्त मनुष्यदिवस निर्मिती करणारे जिल्हे (जिल्हा स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति जिल्हा ३) | (सरासरी मनुष्यदिवस/२) ते सरासरी मनुष्यदिवस निर्मिती करणारे जिल्हे (जिल्हा स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति जिल्हा २) | (१०,००० मनुष्यदिवस) ते (सरासरी मनुष्यदिवस/२) निर्मिती करणारे जिल्हे (जिल्हा स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति जिल्हा १) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ८ जिल्हे<br>पालघर, जालना, अहमदनगर, रत्नागिरी, नंदुरबार, अमरावती, सिधुदूर्ग, सोलापूर<br>(२४ पदे) | ११ जिल्हे<br>नाशिक, औरंगाबाद, रायगड, जळगाव, गडचिरोली, गोंदीया, परभणी, हिंगोली, सांगली, बीड, चंद्रपूर (२२ पदे) | १५ जिल्हे<br>सातारा, उस्मानाबाद, पुणे, यवतमाळ, ठाणे, बुलढाणा, नांदेड, अकोला, वाशिम, वर्धा, नागपूर, धुळे, लातूर,कोल्हापूर व भंडारा<br>(१५ पदे) |

**एकूण -६१**

### ब) वन विभाग

| अ.क्र | सरासरी पेक्षा जास्त मनुष्यदिवस निर्मिती करणारे जिल्हे (जिल्हा स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति जिल्हा ३) | (सरासरी मनुष्यदिवस/२) ते सरासरी मनुष्यदिवस निर्मिती करणारे जिल्हे (जिल्हा स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति जिल्हा २) | (१०,००० मनुष्यदिवस) ते (सरासरी मनुष्यदिवस/२) निर्मिती करणारे जिल्हे (जिल्हा स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति जिल्हा १) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| | १० जिल्हे<br>अमरावती, पालघर, नंदुरबार, नाशिक, यवतमाळ, चंद्रपूर, नांदेड, लातुर, परभणी, उस्मानाबाद<br>(३०- पदे) | ०७ जिल्हे<br>गोंदीया, गडचिरोली, अहमदनगर, बीड, औरंगाबाद, जळगाव, हिंगोली<br>(१४-पदे) | १७ जिल्हे<br>ठाणे, वर्धा, पुणे, नागपूर, सांगली, भंडारा, जालना, सातारा ,सोलापूर, अकोला, वाशीम, कोल्हापूर ,धुळे व बुलढाणा (१७-पदे) |

**एकूण - ६१**

## क) सामाजिक वनीकरण

| अ.क्र | सरासरी पेक्षा जास्त मनुष्यदिवस निर्मिती करणारे जिल्हे (जिल्हा स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति जिल्हा ३) | (सरासरी मनुष्यदिवस/२) ते सरासरी मनुष्यदिवस निर्मिती करणारे जिल्हे (जिल्हा स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति जिल्हा २) | (१०,००० मनुष्यदिवस) ते (सरासरी मनुष्यदिवस/२) निर्मिती करणारे जिल्हे (जिल्हा स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति जिल्हा १) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ११ जिल्हे<br>अमरावती, बुलढाणा, परभणी, जालना, गोंदीया, अकोला, औरंगाबाद, नांदेड, जळगाव, यवतमाळ<br>(३३ -पदे) | ०८ जिल्हे<br>उस्मानाबाद, सांगली, वर्धा, पुणे, भंडारा, चंद्रपूर, पालघर, नागपूर<br>(१६- पदे) | १५ जिल्हे<br>रत्नागिरी, हिंगोली, सोलापूर, नंदुरबार, अहमदनगर, नाशिक, रायगड, बीड, गडचिरोली, लातुर, सातारा, सिंधुदुर्ग, धुळे, ठाणे व कोल्हापूर<br>(१५- पदे) |

**एकूण - ६४**

## ड) रेशीम विभाग

| अ.क्र | जिल्हा स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति जिल्हा-१ |
|---|---|
| १ | ३४ जिल्हे<br>अमरावती, बुलढाणा, परभणी, जालना, गोंदीया, अकोला, औरंगाबाद, नांदेड, जळगाव, यवतमाळ, उस्मानाबाद, सांगली, वर्धा, पुणे, भंडारा, चंद्रपूर, पालघर, नागपूर रत्नागिरी, हिंगोली, सोलापूर, नंदुरबार, अहमदनगर, नाशिक, रायगड, बीड, गडचिरोली, लातुर, सातारा, सिंधुदुर्ग, धुळे, ठाणे,कोल्हापूर व वाशीम<br>(३४ -पदे) |

**एकूण - ३४**

**इ) जिल्हाधिकारी कार्यालय**

| अ.क्र | जिल्हा स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति जिल्हा-१ |
|---|---|
| १ | ३४ जिल्हे<br>अमरावती, बुलढाणा, परभणी, जालना, गोंदीया, अकोला, औरंगाबाद, नांदेड, जळगाव, यवतमाळ, उस्मानाबाद, सांगली, वर्धा, पुणे, भंडारा, चंद्रपूर, पालघर, नागपूर रत्नागिरी, हिंगोली, सोलापूर, नंदुरबार, अहमदनगर, नाशिक, रायगड, बीड, गडचिरोली, लातुर, सातारा, सिंधुदुर्ग, धुळे, ठाणे,कोल्हापूर व वाशीम<br>(३४ -पदे) |

**एकूण - ३४**

**ई) जिल्हा परिषद**

| अ.क्र | जिल्हा परिषद स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति जिल्हा परिषद-२ |
|---|---|
| १ | ३४ जिल्हे<br>अमरावती, बुलढाणा, परभणी, जालना, गोंदीया, अकोला, औरंगाबाद, नांदेड, जळगाव, यवतमाळ, उस्मानाबाद, सांगली, वर्धा, पुणे, भंडारा, चंद्रपूर, पालघर, नागपूर रत्नागिरी, हिंगोली, सोलापूर, नंदुरबार, अहमदनगर, नाशिक, रायगड, बीड, गडचिरोली, लातुर, सातारा, सिंधुदुर्ग, धुळे, ठाणे,कोल्हापूर व वाशीम<br>(६८ -पदे) |

**एकूण - ६८**

**फ) विभागीय आयुक्त कार्यालय**

| अ.क्र | विभागीय आयुक्त कार्यालय स्तरावर उपलब्ध करुन द्यावयाचे मनुष्यबळ प्रति विभागीय आयुक्त कार्यालय -२ |
|---|---|
| १ | ०६ विभाग<br>नागपूर ,औरंगाबाद, अमरावती, नाशिक , कोकण व पुणे (१२ -पदे) |

**एकूण - १२**

**ग) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत अति उत्कृष्ट मनुष्यदिवस निर्मिती करणारे पहिले ५०- तालुके  प्रति तालुका  -१**

| अ.क्र | जिल्हा | तालुका |
|---|---|---|
| १. | अमरावती | अमरावती, चिखलधार, धारणी, मोर्शी, चांदुर-बाजार, दर्यापूर, वरुड व अचलपूर. |
| २. | भंडारा | मोहाडी ,तुमसर, लाखनी, लाखांदूर, साकोली, भंडारा व पौनी. |
| ३. | चंद्रपुर | ब्रम्हपुरी, नागभीर ,चिमूर, सावली, सिंदेवाही व मूल. |
| ४. | धुळे | साक्री व शिरपूर. |
| ५. | गडचिरोली | धानोरा, चार्मोर्शी, गडचिरोली, आरमोरी व कुरखेडा. |
| ६. | गोंदिया | गोंदिया, तिरोडा, अर्जुनी, मोरगाव, सालेकसा, देवरी, गोरेगाव व आमगाव. |
| ७. | हिंगोली | हिंगोली. |
| ८. | जालना | घनसांगवी व परतूर. |
| ९. | नंदुरबार | अक्राणी, अक्कलकुवा, नवापूर, शहादा व नंदुरबार . |
| १०. | उस्मानाबाद | कळंब. |
| ११. | पालघर | विक्रमगड, जव्हार, वाडा व मोखाडा |
| १२. | यवतमाळ | आर्णी व यवतमाळ |

**एकूण  - ५०**

## परिशिष्ट - ब

## आर्थिक वर्ष २०२०-२१ मध्ये विभागीय यंत्रणाने निर्माण केलेल्या मनुष्यदिवसाच्या अनुषंगाने नियुक्त करावयाच्या क्लार्क कम डाटा एंट्री ऑपरेटरांची संख्या

| अ.क्र | विभागाचे नाव | जिल्हयाचे नाव | तालुक्याचे नाव | २५००० मनुष्यदिवस पेक्षा जास्त मनुष्यदिवस निर्मिती तालुक्यांची संख्या | तालुका स्तरावरील एकूण डाटा एन्ट्री ऑपरेटर यांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | कृषी विभाग | पालघर | मोखाडा, जव्हार, डहाणु, पालघर, विक्रमगड | ५ | ५ |
| | | जालना | घनसावंगी, परतुर, भोकरदन, जालना | ४ | ४ |
| | | अहमदनगर | जामखेड, पाथर्डी, कर्जत, श्रीगोंदा | ४ | ४ |
| | | नंदुरबार | अक्राणी, अक्कलकुवा | २ | २ |
| | | गोंदीया | देवरी | १ | १ |
| | | रत्नागिरी | लांजा, राजापूर, रत्नागिरी, दापोली | ४ | ४ |
| | | अमरावती | चिखलदरा, धारणी | २ | २ |
| | | रायगड | कर्जत | १ | १ |
| | | नाशिक | सूरगाणा | १ | १ |
| | | जळगाव | चाळीसगाव | १ | १ |
| | | सिंधुदूर्ग | कुडाळ, मालवण, कणकवली | ३ | ३ |
| **एकूण** | | | | **२८** | **२८** |
| २ | वन विभाग | अमरावती | चिखलदरा, धारणी | २ | २ |
| | | नंदुरबार | अक्राणी, नवापूर | २ | २ |
| | | नाशिक | पेठ, त्रयंबकेश्वर, कलवण | ३ | ३ |
| | | लातुर | लातुर, | १ | १ |
| | | नांदेड | किनवट | १ | १ |
| | | पालघर | वाडा, मोखाडा, विक्रमगड, डहाणू, जव्हार | ५ | ५ |
| | | परभणी | जिंतुर | १ | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **२** | **वन विभाग** | हिंगोली | शेगाव, श्हापूर | २ | २ |
| | | गोंदीया | अर्जुनी मोरगाव | १ | १ |
| | | चंद्रपूर | चंदूद्रपूर, राजुरा | २ | २ |
| **एकूण** | | | | **२०** | **२०** |
| **३** | **सामाजिक वनीकरण** | अमरावती | चांदुर बाजार, तेल्सा, धारणी, अचलपूर | ४ | ४ |
| | | अहमदनगर | अकोले | १ | १ |
| | | औंरगाबाद | पैठण | १ | १ |
| | | बुलढाणा | पावनी, चिखली, खामगाव, मोटाला, बुलढाणा, जळगाव जामोद | ६ | ६ |
| | | गडचिरोली | चामोर्शी | १ | १ |
| | | गोंदीया | अर्जुनी मोरगाव, सालेकसा, गोंदीया, गोरेगाव | ४ | ४ |
| | | जळगाव | पारोळा, यावळ | २ | २ |
| | | जालना | परतुर, बदनापूर, अंबड, घनसावंगी | ४ | ४ |
| | | नांदेड | लोहा, अर्धापूर | २ | २ |
| | | नाशिक | मालेगाव | १ | १ |
| | | उस्मानाबाद | तुळजापुर | १ | १ |
| | | पालघर | मोखाडा | १ | १ |
| | | परभणी | सेलू, परभणी, मानवत, गंगाखेड, पुर्णा, जिंतुर | ६ | ६ |
| | | पुणे | इंदापूर | १ | १ |
| | | रत्नागिरी | मंडणगड | १ | १ |
| | | सांगली | आटपाडी | १ | १ |
| | | वर्धा | कारंजा | १ | १ |
| | | वाशिम | रिसोड | १ | १ |
| | | यवतमाळ | कळंब | १ | १ |
| **एकूण** | | | | **४०** | **४०** |

# परिशिष्ट - क

## आर्थिक वर्ष २०२०-२१ मध्ये विभागीय यंत्रणाने निर्माण केलेल्या मनुष्यदिवसाच्या अनुषंगाने नियुक्त करावयाच्या तांत्रिक सहाय्यकांची संख्या

| अ.क्र | विभागाचे नाव | जिल्हयाचे नाव | सरासरी पेक्षा जास्त मनुष्यदिवस निर्मिती जिल्हयांची संख्या | जिल्हा स्तरावरील तांत्रिक सहाय्यकांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | कृषी विभाग | पालघर, जालना, अहमदनगर, रत्नागिरी, नंदुरबार, अमरावती, सिधुदूर्ग, सोलापूर | ८ | ८ |
| २ | वन विभाग | अमरावती, पालघर, नंदुरबार, नाशिक, यवतमाळ, चंद्रपूर, नांदेड, परभणी, लातुर, उस्मानाबाद | १० | १० |
| ३ | सामाजिक वनीकरण | अमरावती, बुलढाणा, परभणी, जालना, गोंदीया, वाशिम, अकोला, औरंगाबाद, नांदेड, जळगाव, यवतमाळ | ११ | ११ |
| **एकूण** | | | **२९** | **२९** |

*****************